संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे नावे भारतीय स्टेट बँक ऑफ इंडिया या बँकेमध्ये चालू खाते (Current Account) उघडण्यास मंजूरी देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## कौशल्य विकास व उद्योजकता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः आयटीआय-२०१०/५९/प्र.क्र. ३२/व्यशि-३

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ सप्टेंबर, २०१५

**वाचा :**

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र. आयटीआय-२०१०/५९/प्र.क्र. ३२/ व्यशि-३, दि. २५.०५.२०१५

२) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. १७/सीटीएसपरीक्षा/२०१५/४६०, दिनांक २१.०६.२०१५.

**प्रस्तावना :**

राज्यातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये शिल्प कारागीर प्रशिक्षण योजना/शिकाऊ उमेदवारी योजना अंतर्गत व्यवसाय अभ्यासक्रम इत्यादी परिक्षांकरीता परीक्षा शुल्कात सुधारणा करणे/ मानधनात सुधारणा करणे व परीक्षा शुल्काची रक्कम स्वीय प्रपंजी लेखा (PLA) खात्यामध्ये जमा करुन परीक्षेच्या अनुषंगाने येणारा खर्च त्यामधून भागविण्यास शासनाच्या संदर्भीय (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे

महाराष्ट्र राज्यामध्ये ४१७ शासकीय व ४५४ अशासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था कार्यरत आहेत. त्या पैकी शासकीय संस्थांची प्रवेश क्षमता १,००,००० व अशासकीय संस्थांची प्रवेश क्षमता ५०,००० इतकी असून दरवर्षी एकूण १,५०,००० एवढे प्रशिक्षणार्थी प्रशिक्षण घेत आहेत. शिल्प कारागीर प्रशिक्षण योजनेअंतर्गत वर्षातून २ परीक्षा घेतल्या जातात व त्यामध्ये अंदाजे १,००,००० प्रशिक्षणार्थी प्रत्येक परीक्षेस बसतात. तसेच शिकाऊ उमेदवारी योजनेअंतर्गत सुध्दा वर्षातून २ परीक्षा घेतल्या जातात व त्यामध्ये दोन्ही परीक्षेचे मिळून अंदाजे ५०,००० प्रशिक्षणार्थी परीक्षेस बसतात.

सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी जुलै २०१५ चे परीक्षेपासून लागू करण्यात आलेली आहे. त्यानुसार परीक्षा शुल्क स्विकारणे व संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई-०१ यांचे स्विय प्रपंजी लेखा (PLA) खात्यात जमा करणे याबाबतची कार्यवाही सुरु करण्यात आलेली आहे. सद्यस्थितीमध्ये सदरची रक्कम धनाकर्ष (D.D.) स्वरुपात संस्थांकडून स्विकारण्यात येत आहे. उपरोक्त प्रक्रियेमध्ये संस्था स्तरावर व संचालनालयाचे स्तरावर धनाकर्षाचा मेळ घालणे व रिझर्व्ह बँकेतील स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये धनाकर्ष जमा होण्यासाठी लागणारा वेळ

इत्यादी अडचणींचा विचार करता संचालनालयाने दिनांक २२.०६.२०१५ च्या पत्रान्वये संचालक (प्रशिक्षण) यांच्या नावे भारतीय स्टेट बँकेच्या मुंबई मुख्य शाखा, फोर्ट, मुंबई या शाखेमध्ये चालू खाते उघडण्यास मंजूरी देण्याची विनंती शासनास केली आहे. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा सर्वंकष विचार करुन शिल्प कारागीर प्रशिक्षण योजना / शिकाऊ उमेदवारी योजना व एस.सी.व्ही.टी. अंतर्गत व्यवसाय अभ्यासक्रम व इतर अनुषंगिक योजनांतर्गत अभ्यासक्रम इ. अभ्यासक्रमाचे परीक्षा शुल्क जमा करण्यासाठी संचालक (प्रशिक्षण) यांच्या नावे भारतीय स्टेट बँकेच्या मुंबई मुख्य शाखा, फोर्ट, मुंबई या शाखेमध्ये चालू खाते (Current Account ) उघडण्यास खालील अटीस अधिन राहून शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

१) उपरोक्त खाते संचालक (प्रशिक्षण) व लेखा अधिकारी यांचे नावे संयुक्तपणे उघडण्यात येईल.

२) या खात्यासाठी धनादेश पुस्तक (Cheque book) व एटीएम सुविधा देण्यात येणार नाहीत तसेच या खात्यामधून रोख रक्कम, धनादेश, धनाकर्ष याद्वारे रक्कम आहरीत करण्यात येणार नाही.

३) या खात्यामध्ये सध्या प्रचलित असलेल्या पध्दतीनुसार परिक्षा शुल्क व इतर शुल्क रकमेचे धनादेश / धनाकर्ष खात्यामध्ये जमा न करता संपुर्ण महाराष्ट्रातील भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेमध्ये शुल्क रक्कम चलनाद्वारे भरण्यात येईल.

४) या खात्यामध्ये जमा झालेले शुल्क परस्पर रिझर्व्ह बँकेतील संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे नावे असलेल्या स्विय प्रपंची लेखा (PLA) खाते क्रमांक ६१८४३०१००९ यामध्ये R. T. G. S. (Real Time Gross Settlement) याद्वारे जमा करण्यासाठी भारतीय स्टेट बँकेच्या मुंबई मुख्य शाखा, फोर्ट मुंबई यांना निर्देश देण्याची जबाबदारी संचालक (प्रशिक्षण) व लेखा अधिकारी, मुख्य कार्यालय, मुंबई यांची राहील.

५) भारतीय स्टेट बँकेच्या मुंबई मुख्य शाखा, फोर्ट मुंबई या शाखेमधील खात्यामध्ये जमा होणारी रक्कम त्याच दिवशी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई-०१ यांचे नोंदवहीमध्ये नोंदविणे बंधनकारक राहील.

६) या खात्यामधील जमा रकमेचा ताळमेळ प्रतिमाह करणे बंधनकारक राहील.

७) याबाबतचे सर्व अभिलेख महालेखापाल व अंतर्गत लेखा परिक्षण पथक यांना लेखा परिक्षणासाठी उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

८) प्रस्तावित खात्यातून नियमित T+1 मुदतीत स्वीयप्रपंजी लेखा खात्यामध्ये रक्कम जमा करण्याची दक्षता संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांना घ्यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२०/२०१५/कोषा-५, दि. ०९.०९.२०१५ तसेच अनौपचारिक संदर्भ क्र. ५८५/१५/व्यय-५, दि. १९.०८.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१५१६५६२७११०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Madhav Patil

Digitally signed by Vivek Madhav Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=841bf2ba2d65f151b54b8b93f504695966d17aeec76b11455a90a9edb7b50ff1, cn=Vivek Madhav Patil
Date: 2015.10.17 12:09:01 +05'30'

**(विवेक मा. पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे उप सचिव
२) मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मुंबई यांचे खाजगी सचिव
३) मा.प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मुंबई यांचे स्वीय सहायक,
४) सह सचिव (व्यशि), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
५) संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
६) संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
७) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर. (संचालनालयामार्फत)
८) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)
१२) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, (संचालनालयामार्फत)
१३) संबंधित प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, (संचालनालयामार्फत)
१४) वित्त विभाग (व्यय-५/कोषा-५), मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मुंबई.